सामाजिक न्याय विभागांतर्गत शासकीय निवासी शाळेतील विद्यार्थ्यांना आवश्यक सोयी -सुविधा पुरविण्याबाबत .

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक :- बैठक-२०१६/प्र.क्र.२१/शिक्षण-२**
**मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक - ७ ऑगस्ट, २०१७.**

वाचा -:

शासन निर्णय क्र. बीसीएच-२०१०/प्र.क्र. ४३०/मावक-४ दि. २६ जुलै २०११

**शासन परिपत्रक -:**

सामाजिक न्याय विभागांतर्गत कार्यरत असणाऱ्या शासकीय वसतीगृहे व शासकीय निवासी शाळांमधील विद्यार्थ्यांना सोयी सुविधा पुरविणे ही अत्यावश्यक बाब आहे. शासकीय वसतीगृहातील विद्यार्थ्यांना शैक्षणिक सोयी सुविधा शासन निर्णय क्रमांक :- बीसीएच-२०१०/प्र.क्र. ४३०/मावक-४, दिनांक २६ जुलै, २०११ नुसार पुरविल्या जातात. तथापि, शासकीय निवासी शाळेतील विद्यार्थ्यांना सोयी सुविधा पुरविण्यासाठी कोणताही स्वतंत्र शासन निर्णय कार्यान्वित नाही.

शासकीय अनुसूचित जाती निवासी शाळेतील विद्यार्थ्यांना सोयी सुविधा पुरविण्यासंदर्भात प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन असून याबाबत वित्त विभागाशी सल्लामसलत करुन निर्णय घेण्यात येणार असल्याने त्याकरीता आणखी काही कालावधी लागणार आहे. त्यानुषंगाने शासकीय निवासी आश्रमशाळातील विद्यार्थी सदर शैक्षणिक सोयी सुविधांपासून वंचित राहू नयेत म्हणून शासन निर्णय दिनांक २६ जुलै, २०११ अन्वये सामाजिक न्याय विभागांतर्गत असणाऱ्या शासकीय वसतीगृहातील विद्यार्थ्यांना पुरविल्या जाणाऱ्या सोयी सुविधा, पुढील आदेश होईपर्यंत शासकीय निवासी आश्रमशाळांकरीता आवश्यकतेनुसार अनुज्ञेय करण्यात येत आहेत.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०१७०८०९१२४३०८१२२२ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Siddharth Amrutrao Zalte

Digitally signed by Siddharth Amrutrao Zalte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=dc54b49c6f5c903027053476b3a6ef50b46ff44a7e8b820fef7bfdd100c56194, cn=Siddharth Amrutrao Zalte
Date: 2017.08.09 12:34:24 +05'30'

**(सि.अ.झाल्टे )**
**अवर सचिव ,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई

४. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे

५. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा) (लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर

६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/मुंबई उपनगर

७. निवासी लेखा परीक्षक, मुंबई /मुंबई उपनगर

८. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण

९. सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण

१०.सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद.

११.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१२.कार्यासन अर्थसंकल्प, सा.न्या. व वि.स.वि., मंत्रालय, मुंबई

१३.निवड नस्ती -शिक्षण-२